महाराष्ट्र राज्याकरिता जागतिक मानांकनाची महाराष्ट्र धोरण संशोधन संस्था स्थापन करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : मधोसं-२०१७/प्र.क्र.४/२०१७/१२-अ,**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मंत्रालय, मुंबई-४०००३२.**
**दि. ७ जुलै, २०१७**

**प्रस्तावना:-**

जगातील प्रगत व सुशासित देशांमध्ये ध्येयधोरणे ठरवितांना त्यास शास्त्रशुध्द माहिती, विश्लेषण व मूल्यमापन याचा आधार मिळावा यासाठी धोरण क्षेत्रात विशेषज्ञता असणाऱ्या धोरण सशोधन संस्थांमार्फत निरंतर संशोधन करण्यात येते. अशा संशोधनामुळे धोरण ठरविण्यासाठी उपलब्ध पर्याय व त्यांचे तुलनात्मक फायदे तोटे याचे समग्र चित्र शासनासमोर येऊन धोरणात्मक निर्णय अधिक अचूकपणे घेण्यास मदत होते. ही बाब विचारात घेऊन राज्याचा सन २०१६-१७ या वर्षासाठी अर्थसंकल्प विधिमंडळात सादर करताना मा. मंत्री (वित्त व नियोजन) यांनी यशदा या राज्य शासनाच्या शिखर प्रशिक्षण संस्थेच्या माध्यमातून जागतिक मानांकनाची महाराष्ट्र धोरण संस्था स्थापन करण्याची घोषणा केलेली आहे.

महाराष्ट्र धोरण संशोधन संस्थेची संशोधन क्षमता विकसित करणे, धोरण संशोधनाची प्रमाणित कार्यपध्दती तयार करणे, विविध साधने व नमुने विकसित करणे तसेच क्षमताबांधणीसाठी वैशिष्टयपूर्ण प्रशिक्षण कार्यक्रम विकसित करणे यासाठी युनायटेड नेशन्स डेव्हलपमेंट प्रोग्राम (युएनडीपी) या सारख्या व तत्सम राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय संस्थांनी महाराष्ट्रामध्ये धोरण संशोधन संस्था स्थापन करण्यासाठी तांत्रिक व इतर सहकार्य देण्याची तयारी दर्शविली आहे. अशाप्रकारे धोरण क्षेत्रातील नामांकित संस्थांच्या सहाय्यातून महाराष्ट्र राज्यासाठी एक स्वतंत्र धोरण संशोधन संस्था स्थापन करणे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय:-**

१. राज्यात लागू असलेली धोरणे योजना व कार्यक्रम यांचे नियमित मूल्यमापन करणे, धोरणात्मक परीक्षणासाठी धोरण संशोधन करणे, धोरणात्मक पर्यायांचा तौलनिक अभ्यास करुन सर्वाधिक उपयुक्त पर्याय सुचविणे आणि प्रशिक्षणाद्वारे प्रशासकीय सुधारणांना चालना देण्यास्तव यासाठी जागतिक मानांकनाची महाराष्ट्र धोरण संशोधन संस्था, यशदा, पुणे या शिखर प्रशिक्षण संस्थेच्या माध्यमातून स्थापन करण्यास शासन मान्यता देत आहे.

१.१ **धोरण संस्थेचे उद्देश खालीलप्रमाणे आहेत:**

- राज्यातील विविध क्षेत्रांतील/ विभागांतील सद्य:स्थिती व अद्ययावत माहिती एकत्रित स्वरुपात उपलब्ध करुन घेणे.
- राज्यात लागू असलेली धोरणे तसेच शासनाच्या चालू योजना व कार्यक्रम यांचे नियमित मूल्यमापन करुन त्यांची परिणामकारकता, त्यातील त्रुटी/कमतरता तसेच त्या दूर करण्यासाठी धोरणात्मक परीक्षणाची आवश्यकता याबाबत शासनास अवगत करणे.
- शासनाने धोरणात्मक परीक्षणासाठी निश्चित केलेली प्राधान्याची क्षेत्रे/विषय यामध्ये शास्त्रशुद्ध पद्धतीने धोरण संशोधन अभ्यास हाती घेऊन सर्वंकष व वस्तुनिष्ठ सद्य:स्थिती अहवाल उपलब्ध करुन देणे.
- शासनाच्या विचाराधीन असलेल्या धोरणात्मक पर्यायांबाबत इतर राज्ये किंवा देशांमध्ये अंगिकारलेल्या यशस्वी उपक्रमांचा तौलनिक अभ्यास करुन राज्यासाठी उपयुक्त पर्याय शासनासमोर ठेवून निवड करण्यास सहाय्य करणे.
- शासनाच्या विविध विभागांच्या दैनंदिन कार्यपद्धतीमध्ये व कामकाजामध्ये शासनाने अंगिकारलेल्या धोरणात्मक सुधारणांची परिणती होण्यासाठी वैशिष्ट्यपूर्ण प्रशिक्षणाद्वारे सुधारणांना चालना देणे.

**१.२ <u>महाराष्ट्र धोरण संशोधन संस्थेची रचना</u>:**

महाराष्ट्र धोरण संशोधन संस्थेने त्रयस्थपणे काम करण्याबरोबरच शासनाच्या कामकाजाशी दृढपणे संलग्न असणे आवश्यक आहे. यास्तव संस्थेची स्थापना करताना राज्याची संसाधने सुयोग्य पद्धतीने वापरण्यासाठी अस्तित्वात असलेल्या शासकीय संस्था किंवा यंत्रणांचा सर्वतोपरी वापर करण्यात येणार आहे. यादृष्टीने महाराष्ट्र धोरण संशोधन संस्थेच्या खालील प्रमाणे समित्या व केंद्र यांचा अंतर्भाव असलेल्या बहुस्तरीय रचनेस मान्यता देण्यात येत आहे..

अ) **<u>शिखर समिती :</u>**

**शिखर समितीची रचना खालीलप्रमाणे राहील.**

| **अ.क्र.** | **पदाधिकारी/अधिकारी** | **पद** |
|---|---|---|
| १ | मा.मुख्यमंत्री | अध्यक्ष |
| २ | मा.मंत्री, वित्त व नियोजन | सदस्य |
| ३ | मा.मंत्री, उच्च व तंत्रशिक्षण | सदस्य |
| ४. | मा.मंत्री, सार्वजनिक आरोग्य | सदस्य |
| ४ | मा.मुख्य सचिव | सदस्य |
| ५. | सल्लागार समितीचे अध्यक्ष | सदस्य |
| ६. | राष्ट्रीय ख्यातीचे **दोन** धोरण संशोधन किंवा विश्लेषण तज्ञ (शासनाद्वारे नियुक्त) | सदस्य |
| ७. | अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/ सचिव (सेवा) | सदस्य सचिव |

ज्या प्रशासकीय विभागाच्या विषयावर धोरणात्मक संशोधन हाती घ्यावयाचे आहे तसेच झालेल्या संशोधनाच्या अहवालाचे परीक्षण करावयाचे आहे त्या विषयाशी व विभागाशी संबंधित मा.मंत्री हे सदस्य म्हणून निमंत्रित राहतील. केंद्रीय नीती आयोग, केंद्रीय वित्त आयोग, केंद्रीय प्रशासकीय सुधारणा आयोग यामधील आजी किंवा माजी सदस्य यांना विचारविनिमयासाठी शिखर समितीच्या बैठकीस आवश्यकतेनुसार निमंत्रित करण्यात येईल. धोरण संशोधनाविषयी योग्य ते प्रस्ताव शासन/ मा.मंत्रिमंडळ यांच्या मान्यतेस्तव सादर करण्याचा निर्णय शिखर समिती घेईल.

**ब) <u>उच्चाधिकार समिती</u>**

उच्चाधिकार समिती मा. मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखाली राहील. त्या समितीची रचना पुढीलप्रमाणे राहील.

| **अ.क्र.** | **अधिकारी** | **पद** |
|---|---|---|
| १ | मा.मुख्य सचिव | अध्यक्ष |
| २ | अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव (सेवा), सामान्य प्रशासन | सदस्य |
| ३ | अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव /सचिव (वित्त), | सदस्य |
| ४ | अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव /सचिव (नियोजन), | सदस्य |
| ५. | महासंचालक, यशदा | सदस्य |
| ६. | दोन नामांकित धोरण संशोधन/विश्लेषण तज्ञ (शासनाद्वारे नियुक्त) | सदस्य |
| ७. | महासंचालक, प्रस्तावित महाराष्ट्र धोरण संशोधन संस्था | सदस्य सचिव |

ज्या प्रशासकीय विभागाच्या विषयावर धोरणात्मक संशोधन हाती घ्यावयाचे आहे तसेच झालेल्या संशोधनाच्या अहवालाचे परीक्षण करावयाचे आहे त्या विषय व विभागाशी संबंधित सचिव हे सदस्य म्हणून निमंत्रित राहतील. तसेच केंद्र शासनातील वरिष्ठ अधिकारी यांना आवश्यकतेनुसार विचारविनिमयासाठी निमंत्रित करण्यात येईल.

उच्चाधिकार समितीकडून धोरण संशोधनासाठी वेळोवेळी प्राधान्य क्षेत्रे व विषय निश्चित करण्यात येतील. त्याचबरोबर संशोधनातून प्राप्त झालेल्या शिफारशींचे परीक्षण करुन आवश्यक त्या सुधारणा करुन अभिप्रायांसह सदर शिफारशी शिखर समितीकडे सादर करण्यात येतील.

क) **धोरण संशोधन केंद्र:**

उच्चाधिकार समितीने निश्चित केलेल्या विषयांवर तातडीने संशोधन हाती घेण्यासाठी प्रारंभिक टप्प्यात यशदामध्ये एक धोरण संशोधन केंद्र निर्माण करण्यात येईल. या केंद्रामार्फत प्रत्यक्ष संशोधनाचे कार्य हाती घेण्यात येईल. तसेच आवश्यकतेनुसार राज्यातील शासकीय विद्यापीठे, संशोधन संस्था व नियोजन विभागामार्फत मूल्यमापन कामासाठी नेमण्यात आलेल्या (Empanelled) संस्था यांचे सहाय्य घेण्यात येईल.

ड) **प्रशासकीय सुधारणा कक्ष:**

प्रत्येक प्रशासकीय विभागामध्ये धोरण व संशोधन विषयामध्ये आवड असणारे मंत्रालयीन स्तरावरील एक अधिकारी, त्या विभागाच्या अधिनस्त असलेल्या आयुक्तालय किंवा संचालनालय स्तरावरील तसेच महसुली विभाग, जिल्हा व तालुका स्तरावरील प्रत्येकी एक अधिकारी यांचा समावेश असलेला प्रशासकीय सुधारणा कक्ष स्थापन करण्यात येईल. या कक्षामार्फत संशोधनासाठी आवश्यक असलेली माहिती व दस्तऐवज संशोधन केंद्राला/ संस्थेला पुरविणे, संशोधन अहवालाचे त्रयस्थ परीक्षण करण्यासाठी तज्ञांची अहवाल पुनर्विलोकन समिती आवश्यकतेनुसार स्थापन करणे, विभागाच्या सचिवांच्या अभिप्रायासह अहवाल उच्चाधिकार समितीस सादर करणे या व इतर अनुषंगिक बाबींवर कार्यवाही करण्यात येईल.

ई) **सल्लागार समिती**

यशदातील धोरण संशोधन केंद्राच्या सुरुवातीच्या कामकाजाचा अनुभव लक्षात घेऊन त्या आधारे धोरण संशोधन संस्थेच्या नियमित कामकाजाची रचना व स्वरुप ठरविण्यासाठी एक सल्लागार समिती स्थापन करण्यात येईल. सदर सल्लागार समितीची रचना खालीलप्रमाणे राहील.

| अ.क्र. | पदाधिकारी/अधिकारी | पद |
|---|---|---|
| १ | सार्वजनिक क्षेत्रातील प्रथितयश व नामांकित व्यक्ती | अध्यक्ष |
| २ | विविध क्षेत्रातील तज्ञ सदस्य | सदस्य |
| ३ | धोरण क्षेत्रातील तज्ञ | सदस्य |
| ४ | महासंचालक, यशदा | सदस्य |
| ५. | यशदातील धोरण संशोधन केंद्राचे प्रमुख | पदसिद्ध सदस्य सचिव |

सदर समितीस यशदातील धोरण संशोधन केंद्राचे कार्यालयीन सहाय्य पुरवण्यात येईल. या समितीद्वारे धोरण संशोधन संस्थेचे स्वरुप, त्याची नोंदणी, नियामक मंडळ, नियम व नियमावली इत्यादींबाबत विविध पर्यायांचा विचार करुन सुयोग्य पर्यायांची शासनास शिफारस करण्यात येईल.

२. **महाराष्ट्र धोरण संशोधन संस्थेची कार्यपद्धती:**

उपरोक्त चार स्तरावरील शिखर समिती, उच्चाधिकार समिती, प्रशासकीय सुधारणा कक्ष व धोरण संशोधन केंद्र याद्वारे धोरण संशोधन संस्थेचे कार्यान्वयन होईल. सदर संस्थेच्या नोंदणीबाबत सल्लागार समितीच्या अहवालातील शिफारशीनुसार कार्यवाही करण्यात येईल. सदर संस्थेची कार्यपध्दती, रचना व स्वरुप इ. बाबत सल्लागार समितीच्या अहवालातील शिफारशीनुसार तसेच त्यावरील उच्चाधिकार समितीच्या अभिप्रायानुसार कार्यवाही करण्यात येईल. संस्थेची खालील नमूद कार्यपध्दती सूचक व दिशादर्शक स्वरुपाची आहे. महाराष्ट्र धोरण संस्था नियमितपणे कार्यान्वित होईपर्यंत प्रशासकीय विभागांकडून धोरण संशोधनासाठी संभाव्य विषयांचे संकलन धोरण संशोधन केंद्रामार्फत करण्यात येईल.

संशोधनासाठी प्राधान्य क्षेत्रांची/ विषयांची निवड उच्चाधिकार समितीद्वारे करण्यात येईल. प्राधान्य क्षेत्र/ विषयानुसार संशोधन प्रकल्प राबविण्यासाठी धोरण संशोधन संस्थेकडून योग्य संस्थांची निवड करण्यात येईल. नामांकित धोरण संस्थांच्या सहाय्याने निवडलेल्या संस्थांना संशोधनाच्या प्रमाणित कार्यपद्धतीवर आधारित वैशिष्ट्यपूर्ण प्रशिक्षण देण्यात येईल. निवडलेल्या संस्थांद्वारे होणाऱ्या प्रत्यक्ष संशोधन प्रक्रियेचे धोरण संशोधन संस्थेकडून संनियंत्रण करण्यात येईल. प्रशासकीय सुधारणा कक्षाद्वारे संशोधनासाठी आवश्यक माहिती निवडलेल्या संस्थेला उपलब्ध करुन देण्यात येईल. तसेच माहिती तंत्रज्ञान क्षेत्र किंवा कॉर्पोरेट सोशल रिस्पॉसिबिलीटी क्षेत्रातील नामांकित संस्थांच्या सहाय्याने संशोधनासाठी ऑनलाईन ज्ञान व्यवस्थापन प्रणाली निवडलेल्या संस्थांसाठी वापरण्यात येईल. संस्थांकडून प्राप्त झालेले संशोधन अहवाल मंत्रालयीन विभागांकडे पाठविण्यात येतील. विभागांतर्गत आवश्यकतेनुसार पुनर्विलोकन समित्यांकडून परीक्षण करण्यात येईल. त्यानंतर विभागांच्या विभागाच्या सचिवांच्या अभिप्रायासह अहवाल उच्चाधिकार समितीस सादर करण्यात येईल. सदर अहवाल उच्चाधिकार समितीच्या अभिप्रायासह शिखर समितीकडे सादर करण्यात येईल. शिखर समितीद्वारे त्याबाबत विचार होऊन धोरणात्मक सुधारणा लागू करण्याबाबत निर्णय घेण्यात येईल. लागू झालेल्या धोरणात्मक सुधारणांच्या अंमलबजावणीचे मूल्यमापन करण्यात येईल.

**३. <u>संशोधनाची विषयसूची, प्रमाणित कार्यपद्धती, संस्थांची निवड व क्षमता बांधणी, संनियंत्रण, धोरणात्मक पर्यायांचे विश्लेषण:</u>**

धोरण संशोधन संस्थेमार्फत करावयाच्या धोरण संशोधनामध्ये स्थायी व प्रासंगिक अशा विषयसूची असतील.

**३.१ <u>विषयसूची</u>**

**(अ) स्थायी विषयसूची**

राज्याकरिता दूरगामी महत्व असलेल्या विषयांची एक स्थायी विषयसूची उच्चाधिकार समितीच्या मार्गदर्शनाखाली तयार करण्यात येईल. स्थायी विषयांवरील संशोधन हे दीर्घकाळ व सातत्यपूर्ण (Longitudinal) अशा स्वरुपाचे राहील. यामध्ये सद्य:स्थितीचे मूल्यमापन, मूल्यमापनाच्या आधारे सुधारणांसाठी शिफारशी, शासन स्वीकृत शिफारशींची अंमलबजावणी, अंमलबजावणीच्या फलनिष्पत्तीचे नियमित मूल्यमापन व त्या आधारे पुन:श्च सुधारणांसाठी शिफारशी असे अखंड चक्र असेल.

**(ब) प्रासंगिक विषयसूची**

उच्चाधिकार समितीने निश्चित केलेल्या प्राधान्यक्रमानुसार प्रासंगिक विषयसूची तयार करण्यात येईल. प्रासंगिक विषयांवरील संशोधन हे तात्कालिक (Cross-Sectional) अशा स्वरूपाचे राहील. विषयसूचीनुसार योग्य संस्थेची निवड करुन संशोधनासाठी येणाऱ्या खर्चाचा प्रस्ताव निवडलेल्या संस्थांमार्फत संबंधित विभागांना पाठवण्यात येईल. त्यानुसार आवश्यक निधी विभागाकडून उपलब्ध करुन देण्यात येईल. संशोधनाचा अहवाल विभागाच्या सचिवांमार्फत उच्चाधिकार समितीस पुढील कार्यवाहीस्तव सादर करण्यात येईल.

**३.२ <u>संशोधनाची प्रमाणित कार्यपद्धती</u>:**

यशदातील धोरण संशोधन केंद्रामार्फत धोरण संशोधनाच्या क्षेत्रातील नामांकित संस्थांच्या सहाय्याने संशोधन प्रक्रियेतील प्राथमिक प्रस्तावापासून अंतिम अहवालापर्यंतच्या सर्व टप्प्यांची प्रमाणित कार्यपद्धती (Standard Operating Procedure) व आदर्श नमुने (Model Templates) विकसित करण्यात येतील. प्रमाणित कार्यपद्धतीचे संशोधन पद्धती, प्रकल्प व्यवस्थापन, वित्तीय नियोजन असे मुख्यत: तीन भाग असतील. संशोधनाचे संनियंत्रण वेळोवेळी प्रमाणित कार्यपद्धतीनुसार करण्यात येईल.

**३.३ <u>संशोधनासाठी संस्थांची निवड व क्षमता बांधणी</u>:**

उच्चाधिकार समितीने निश्चित केलेल्या विषयांवर संशोधन हाती घेण्यासाठी संशोधनाच्या स्वरुपानुसार राज्यातील शासकीय तसेच निवडक खाजगी विद्यापीठे, संशोधन संस्था, प्रशिक्षण संस्था व महाविद्यालये तसेच केंद्र शासनाच्या राज्यातील संस्था यांची यादी तयार करण्यात येऊन त्यानुसार प्रत्यक्ष संशोधनासाठी सुयोग्य संस्थेची निवड करण्यात येईल. अशा संस्थांना क्षमतावृद्धीसाठी प्रशिक्षण देण्यात येईल.

३.४ **<u>संशोधनाचे संनियंत्रण व विश्लेषण :</u>**

संशोधन कार्याचे संनियंत्रण करण्यासाठी धोरण संशोधन केंद्रामध्ये एक संनियंत्रण शाखा असेल. संशोधन प्रस्तावाची रुपरेषा, संशोधन प्रकल्प राबविण्याची पध्दती, संशोधन अहवालाची रचना, संशोधन कार्यासाठी येणाऱ्या खर्चाचे मापदंड, इ. बाबी धोरण संशोधन केंद्राद्वारे वेळोवेळी निश्चित करण्यात येतील व ते संशोधन करणाऱ्या संस्थांना मार्गदर्शक स्वरुपात कळविण्यात येतील, अशा मार्गदर्शक सूचनांच्या आधारे धोरण संशोधन केंद्र धोरण संशोधनाचे संनियंत्रण करील. प्रशासकीय विभागाच्या कामकाजात धोरण संशोधनाची संकल्पना रुजावी, यासाठी संशोधनाच्या विविध टप्प्यावर सहाय्य करण्यासाठी संशोधन सहयोगी यशदाच्या धोरण संशोधन केंद्रामार्फत उपलब्ध करुन देण्यात येतील. संनियंत्रण शाखेद्वारे संशोधन आकृती बंधाच्या प्रारंभिक टप्प्यावर, प्रत्यक्ष संशोधनाच्या विविध मध्यावधील टप्प्यावर आणि संशोधनाच्या शिफारशी व सूचना वस्तुनिष्ठ आहेत का, हे तपासण्यासाठी अंतिम टप्प्यात संशोधन निष्पित्तीचे परीक्षण अशा तीन टप्प्यात संशोधनाचे परिक्षण करण्यात येईल. संशोधनाच्या आधारे शिफारशी प्राप्त झाल्यानंतर प्रत्यक्ष निर्णय घेऊन अंमलबजावणी करण्यास सुकर व्हावे, यासाठी संभाव्य पर्याय किंवा विकल्प यासंदर्भात संबंधित देशोविदेशीचे अनुभव, यशोगाधा, अपयशी उपक्रम या अनुषंगाने विश्लेषणात्मक तौलनिक अभ्यास धोरण संशोधन केंद्रामार्फत करण्यात येईल.

४. **<u>धोरण संशोधन केंद्राचे कार्य :-</u>**

संशोधन संस्थेच्या उपरोक्त नमूद कार्यपध्दतीतील खालील कामे धोरण संशोधन केंद्रामार्फत करण्यात येतील.

- प्रशासकीय विभागांकडून धोरण संशोधनासाठी संभाव्य विषय वेळोवेळी मागवणे व संशोधनाची प्रासंगिक तसेच स्थायी विषयसूची तयार करण्यासाठी कार्यगटास सहाय्य करणे.
- उच्चाधिकार समितीने धोरण संशोधनासाठी प्राधान्याचे विषय निश्चित केल्यानंतर त्यावर संशोधन हाती घेण्यासाठी विषयांच्या स्वरुपानुसार संस्थांची निवड करणे.
- संशोधनाच्या स्वरुपानुसार उपरोक्त यादीतून सुयोग्य संस्थांची निवड करुन त्यांना संशोधनाची जबाबदारी नेमून देणे.
- विविध संस्थांमार्फत संशोधन हाती घेण्यापासून त्याचा अंतिम अहवाल संबंधित विभागास सादर करण्यापर्यंत सर्व टप्पे हे एका सुनियोजित पद्धतीने राबविण्यास्तव प्रमाणित कार्यपद्धती तसेच विविध प्रकारचे नमुने विकसित करणे.
- प्रमाणित केलेल्या कार्यपद्धतीनुसार विषयतज्ञांच्या मदतीने संस्थांचे वेळोवेळी क्षमतावृद्धी प्रशिक्षण आयोजित करणे.
- हाती घ्यावयाच्या संशोधनाचे उद्देश, पद्धती, कालबद्ध कार्यक्रम, खर्चाचे अंदाजपत्रक हे निश्चित करण्यासाठी संशोधनाच्या आरंभी संबंधित संस्था तसेच इतर महत्वाचे घटक यांची कार्यशाळा आयोजित करणे.
- संस्थांमार्फत संशोधन हाती घेतल्यावर उपरोक्त नमूद पद्धतीने तीन टप्प्यांवर त्यांचे गुणवत्ता नियंत्रण करणे.
- संस्थांमार्फत प्रारुप अहवाल तयार झाल्यावर आवश्यकतेनुसार त्याचे त्रयस्थ परीक्षण करण्यासाठी तात्पुरती अहवाल पुनर्विलोकन समिती तयार करण्याकरीता संबंधित प्रशासकीय विभागास सुचवणे.
- प्रशासकीय विभागाच्या गटांना संशोधन प्रक्रियेच्या सर्व टप्प्यांवर सहाय्य करण्यासाठी फेलोशीप तत्वावर संशोधन समन्वयकांच्या सेवा उपलब्ध करुन देणे.

५. **<u>धोरण संशोधन क्षेत्रातील नामांकित संस्थांचे सहाय्य:</u>**

धोरण संशोधन संस्थेसाठी धोरण संशोधन क्षेत्रातील राष्ट्रीय-आंतरराष्ट्रीय स्तरावरील नामांकित संस्था तसेच धोरण संशोधनासाठी आवश्यक माहितीचे एकत्रीकरण करणे, ऑनलाईन माहितीकोष तयार करणे, निर्णय प्रक्रियेस आधारभूत साधने विकसित करणे तसेच धोरणात्मक सुधारणांच्या प्रभावी अंमलबजावणीसाठी प्रशासकीय कामकाजामध्ये आधुनिक व्यवस्थापन पद्धतींचा प्रसार करणे आणि एकंदरीतच माहिती तंत्रज्ञानाचे पाठबळ देऊन प्रभावी संनियंत्रण प्रणाली विकसीत करणे यासाठी तंत्रज्ञान क्षेत्रातील तसेच सीएसआर क्षेत्रातील नामांकित क्षेत्रातील संस्थांचे सहाय्य घेण्यास व आवश्यकतेनुसार सामंजस्य करार करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

**६. धोरण संशोधन संस्थेच्या कामकाजाचे टप्पे:**

**६.१ प्रारंभिक टप्पा:**

महाराष्ट्र धोरण संशोधन संस्थेचे कामकाज यशदाच्या सध्याच्या आवारातून धोरण संशोधन केंद्राच्या स्वरुपात सुरु करण्यात येईल. या कामकाजासाठी यशदातील साधन सामग्रीचा सुयोग्य वापर करण्यात येईल. यासाठी आवश्यकतेनुसार कंत्राटी मनुष्यबळ घेण्यात येईल. प्रारंभिक टप्प्यात उच्चाधिकार समितीने निश्चित केलेल्या स्थायी/ प्रासंगिक अशा महत्वाच्या पाच विषयांवर जलद पद्धतीने संशोधन करण्यासाठी दरवर्षी पथदर्शी संशोधन प्रकल्प हाती घेण्यात येतील.

६.२ नियमित कामकाज

धोरण संशोधन संस्थेचे नियमित कामकाज सुरु होण्यासाठी समांतरपणे ताथवडे येथील ४८ हे. च्या भूखंडावर संस्थेच्या आवाराचा संपूर्ण आराखडा (Master Plan) तयार करण्यात येवून स्वतंत्र आवार निर्माण करण्यास मान्यता देण्यात यावी. सल्लागार समितीमार्फत संस्थेच्या पदांचा आकृतिबंध निश्चित झाल्यानंतर व त्यानुसार उच्चाधिकार समितीच्या मान्यतेने आवश्यक पदनिर्मिती आणि संस्थेची इमारत, कार्यालयीन खर्च इ. अनुषंगिक बाबींसाठी वित्तीय तरतूद करण्यास शासन मान्यता देत आहे.

**७. धोरण संशोधन संस्थेच्या संनियंत्रणासाठी मंत्रालयातील कक्ष:**

धोरण संशोधन संस्थेच्या संनियंत्रणासाठी मंत्रालयात एक स्वतंत्र कक्ष स्थापन करुन त्या कक्षासाठी आवश्यक पदनिर्मिती उच्चाधिकार समितीच्या मान्यतेने करण्यास तसेच त्यासाठी आर्थिक तरतूद करण्यास शासन मान्यता देत आहे.

८. आर्थिक तरतूद

**धोरण संशोधन संस्थेचे नियमित कामकाज सल्लागार समितीच्या अहवालातील शिफारशीनुसार होणार आहे. तथापि, सध्या प्रारंभिक टप्प्यात ते कार्य यशदा, पुणे या संस्थेतील धोरण संशोधन केंद्रामार्फत पार पाडण्यास तसेच त्यासाठी वार्षिक रु. ५ कोटी पर्यंत निधी यशदास देण्यास शासन मान्यता देत आहे.**

**महाराष्ट्र धोरण संशोधन संस्थेसाठी सल्लागार समितीने केलेल्या शिफारशी, तयार केलेला संपूर्ण आराखडा तसेच त्यावर उच्चाधिकार समितीने दिलेले निदेश विचारात घेऊन ताथवडे येथे इमारत बांधकाम, प्रशासकीय सोयी व मनुष्यबळ तसेच इतर अनुषंगिक बाबी उपलब्ध करुन देण्यात येतील. उच्चाधिकार समितीच्या मान्यतेने आवश्यक पदनिर्मिती आणि इतर सर्व बाबींसाठी लागणारा निधी उपलब्ध होण्यासाठी वित्तीय तरतूद करण्यास शासन मान्यता देत आहे.**

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०१७०७०७१२३५०६०००७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षंकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

Mukesh Khullar

Digitally signed by Mukesh Khullar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=GAD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=6481e097db98eaae8b0580130544ebced12d1340cea24fcd0132235fb0c544a8, cn=Mukesh Khullar
Date: 2017.07.07 12:34:02 +05'30'

**(मुकेश खुल्लर)**
**अपर मुख्य सचिव (सेवा)**

**प्रति,**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभावन, मलबार हिल, मुंबई.
२) मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.

३) सर्व मा.मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव/स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२.
४) मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई -३२.
५) सर्व अपर मुख्य सचिव, प्रधान सचिव, सचिव, मंत्रालयीन विभाग.
६) प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
७) सर्व विभागीय आयुक्त.
८) सर्व जिल्हाधिकारी.
९) महासंचालक, यशदा, बाणेर रोड, पुणे-४११ ००७.
१०) सर्व मंत्रालयीन विभाग.
११) मा.विरोधी पक्ष नेता, विधानसभा/विधानपरिषद, महाराष्ट्र, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
१२) सर्व सन्माननीय विधानसभा/विधानपरिषद सदस्य महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई
१३) प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ शाखा, मुंबई, औरंगाबाद, नागपूर *
१४) प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई, औरंगाबाद, नागपूर *
१५) प्रबंधक, लोक आयुक्त आणि उपलोकआयुक्त कार्यालय, मुंबई *
१६) महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र-१, मुंबई.
१७) महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र-२, नागपूर.
१८) महालेखापाल, लेखा परीक्षा, महाराष्ट्र-१, मुंबई.
१९) महालेखापाल, लेखा परीक्षा, महाराष्ट्र-२, नागपूर.
२०) अपर मुख्य सचिव (सेवा) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२.
२१) निवडनस्ती/कार्या-१२अ, साप्रवि, मंत्रालय, मुंबई-३२.

* पत्राने